घर बांधणी अग्रिम -
अनुज्ञेय महागाई वेतन

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक : अग्रिम-१०.०४/प्र.क्र.३९/०४/विनियम,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ९ फेब्रुवारी, २००५

वाचावे :- १) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र. मभवा-११.०४/प्र.क्र.५/सेवा-९, दि. १९ जुलै,२००४.
२) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र. घबांअ-१०.९९/प्र.क्र.२/९९/विनियम, दि. ८ जुलै,१९९९.

प्रस्तावना : राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना, मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील परिशिष्ट - २६ मधील विहित नियमांच्या व उपरोक्त संदर्भित क्र.२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून घर बांधणी अग्रीम अनुज्ञेय आहे. घर बांधणी अग्रिम मंजूर करताना वित्त विभागाच्या दिनांक १९ जुलै,२००४ च्या शासन निर्णयाअन्वये अनुज्ञेय असलेले महागाई वेतन विचारात घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. यासंदर्भात शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

## निर्णय

राज्य शासनाने दिनांक १.८.२००४ पासून राज्य शासकीय कर्मचा-यांना लागू केलेले महागाई वेतन राज्य शासकीय कर्मचा-यांना घरबांधणी अग्रिम मंजूर करताना विचारात घेण्यात यावे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.२ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील परि.क्र.१ येथील अ,ब,क,ड येथे नमूद केलेली घर बांधणी अग्रिमाच्या रकमेची कमाल मर्यादा ही कायम राहील. त्याचप्रमाणे सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक - ४ मध्ये विहित केलेली परतफेडीची क्षमता निश्चित करताना मूळ वेतनाबरोबर अधिक ५० टक्के महागाई वेतनही विचारात घेण्यात यावे.

३. सदरचे आदेश दिनांक १.८.२००४ पासून लागू करण्यात यावेत.

४. राज्य शासकीय कर्मचा-यांना घर बांधणी अग्रिम मंजूर करताना त्यांना अनुज्ञेय असलेले महागाई वेतन विचारात घेण्याबाबतचे आदेश दिनांक १.८.२००४ पासून लागू असल्याने दिनांक १.८.२००४ ते विचाराधिन आदेश निर्गमित करण्याच्या दिनांकापर्यंत ज्या राज्य शासकीय कर्मचा-यांना शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ८ जुलै,१९९९ अन्वये घर बांधणी अग्रिम मंजूर करण्यात आलेला आहे, अशा कर्मचा-यांना महागाई वेतन मूळ वेतनात विलिन केल्यामुळे झालेल्या मूळ वेतनातील फरकांच्या ५० पट इतके वाढीव घर बांधणी अग्रिम खालील अटीच्या अधिन राहून मंजूर करण्यात यावे.

अ) अग्रिम धारकांनी वाढीव अग्रीम मंजूरीबाबतचा अर्ज सदर शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत सादर करावा. कोणत्याही परिस्थितीत ६ महिन्याची विहित कालमर्यादा टळून गेल्यानंतर प्राप्त होणाऱ्या वाढीव घर बांधणी अग्रिम मंजूरीच्या अर्जाचा विचार करण्यात येऊ नये.

रोटा/एच-905(12500+15-2-05)-1

ब) अग्रिम धारकांनी पूर्वी सादर करण्यात आलेल्या मंजूर बांधकाम नकाशात बदल नसावा.

क) पूर्वी सादर करण्यात आलेल्या खर्चाच्या अंदाजपत्रकातीलच रक्कम विचारात घ्यावी.

ड) अग्रिम धारकांकडून वाढीव अग्रिमाबाबत आवश्यक असले तर पूरक गहाणखत, वैयक्तिक बंधपत्र व जामिनखत घेण्यात यावे.

इ) वाढीव घर बांधणी अग्रिम मंजूर करताना ते कर्मचा-यांच्या सेवानिवृत्तीपूर्वी व्याजासह वसूल होईल याची खात्री अग्रिम मंजूर करण्या-या प्राधिका-याने करावी.

ई) वाढीव अग्रिमांवर सुधारित व्याजदर आकारण्यात यावा. (सुधारित व्याजदर आकारण्यासाठी पूर्वी मंजूर केलेले अग्रिम अधिक वाढीव अग्रिम एकत्र करुन अग्रिम रक्कमेचा टप्पा ठरविण्यात यावा).

फ) या आदेशानुसार वाढीव अग्रिम मंजूर करण्यात आल्यास कर्मचा-यांकडून गहाणखत वैयक्तिक बंधपत्र जामिन या संबधित कागदपत्रे पुन्हा नव्याने घेण्यात यावे. याबाबतचा खर्च कर्मचा-यांने स्वत: सोसावा.

५. तसेच घराची किंमत मर्यादा, घर बांधणी अग्रीमावरील व्याजदर, वसूली याबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय / आदेश हे सुध्दा पुढील आदेश होई पर्यंत अंमलात राहतील.

६. मुंबई वित्तीय नियम १९५९ च्या परिशिष्ट २६ मधील घर बांधणी अग्रिम विषयक नियमांमध्ये औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( श. मा. भुते )
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
१०. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग
११. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

एच 905(12500+15-2-05)-1ब

१५. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई

* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई

* १७. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई

* १८. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४. अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई

* १९ प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

* २० सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

* २१. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई

* २२ प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१

२३. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक / अमरावती

२४. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती

२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२६. सर्व उप कोषागार अधिकारी

२७. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख

२८. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ),मंत्रालय, मुंबई:३२

२९. सर्व विभागीय आयुक्त

३०. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३१. सर्व जिल्हाधिकारी

३२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

३३. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी

३४. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१

३५. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१

३६. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३७. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे.

---

एच-905(12500+15-2-05)-2.